**ज्योती एज्युकेशनल सोसायटी कळंबोली संचालित कारमेल कॉन्हेंट हायस्कूल, कळंबोली, जि.रायगड या शाळेचे अमर सेवा समिती, ब्रांद्रा, मुंबई या संस्थेस व्यवस्थापन हस्तांतराबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः माशाह-३१२४/प्र.क्र.३३३/२४/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०१ जुलै, २०२४

**वाचा :** शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक माशाह २०११/(२१०/११)/माशि-३ दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२

**संदर्भ :** विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई यांचे जा.क्र.शिउसं/माध्य-२/व्यवस्थापन बदल/२०२३/६७००, दि.१२.१०.२०२२ चे पत्र.

**प्रस्तावना :**

ज्योती एज्युकेशनल सोसायटी, कळंबोली, जि. रायगड संचालित कारमेल कॉन्हेंट हायस्कूल, कळंबोली, ता.पनवेल, जि.रायगड या इंग्रजी माध्यमाच्या स्वंयअर्थसहाय्यित माध्यमिक (इयत्ता १ वी ते ८ वी,युडायस नं.२७२४०८१७४१० व इ.८ वी ते १०वी, युडायस नं.२७२४०८१७४२२), शाळेचे अमर सेवा समिती, ब्रांद्रा, मुंबई या संस्थेस व्यवस्थापन हस्तांतर करण्याचा संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

सदर शाळेचे व्यवस्थापन अमर सेवा समिती, ब्रांद्रा, मुंबई या संस्थेकडे हस्तांतरीत करण्यास खाली नमूद अटी व शर्तीवर मान्यता देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे:-

(१) व्यवस्थापन हस्तांतर झालेल्या शाळेची किमान पटसंख्येची अट कोणत्याही कारणास्तव शिथिल केली जाणार नाही.

(२) व्यवस्थापन हस्तांतर झालेल्या शाळेच्या बाबतीत शासन परवानगीच्या/मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाहीत याची खबरदारी घेण्यात यावी.

(३) सदर शाळा इंग्रजी माध्यमाची स्वयंअर्थसहाय्यित तत्त्वावरील असल्याने कार्यरत शिक्षक/शिक्षकेतर कर्मचा-यांचे संपूर्ण दायित्व व्यवस्थापन हस्तांतर स्वीकारणाऱ्या संस्थेवर राहील.

(४) शासनाकडून शाळा, शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेत्तर अनुदान, विद्यार्थी इ. बाबत वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ. चे पालन करणे नवीन संस्थेस बंधनकारक राहील.

(५) सदर व्यवस्थापन हस्तांतर, शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्रमांक: माशाह २०११/(२१०/११) माशि-३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२ मध्ये विहित केलेल्या नियमानुसार व कार्यपद्धतीनुसार अंमलात येईल.

(६) सदर व्यवस्थापन हस्तांतरासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे नव्याने तक्रारी प्राप्त झाल्यास किंवा व्यवस्थापन हस्तांतर संदर्भातील अटी व शर्तीचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास किंवा व्यवस्थापन हस्तांतरापूर्वीच्या संस्थेतील कार्यरत शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या सेवाशर्तींचा नवीन संस्थेद्वारा भंग झाल्यास, व्यवस्थापन हस्तांतर रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

(७) सदर शाळेचे प्राथमिक व माध्यमिक विभाग प्रत्यक्षात एकत्रित कार्यरत आहेत. परंतु प्राथमिक व माध्यमिक विभागास स्वतंत्र Udise असल्याने दोन शाळा असल्याचे दिसते. सबब, प्रस्तुत व्यवस्थापन हस्तांतराबाबत पुढील कार्यवाही करण्यापूर्वी दोन्हीपैकी एक Udise code दुसऱ्यामध्ये विलीन करण्यात यावा व इ.१ ली ते १० वी साठी भविष्यात एकच Udise कार्यरत राहील याची खबरदारी घेण्यात यावी

२. विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई यांनी सर्व बाबी तपासून व वरील अटी/शर्ती व्यतिरिक्त आवश्यक अटींचा समावेश करून, शाळेचे व्यवस्थापन हस्तांतराबाबत पुढील कार्यवाही १५ दिवसांत करावी व त्याबाबत शासनास अवगत करावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७०११८५८०७१३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN RAJARAM MUNDHE

Digitally signed by PRAVIN RAJARAM MUNDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda349596 9f77d97c89a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=DC78036626EC580D66C0AC502D43AF5F670B5BA13F512 13AD071ACD53714A284, cn=PRAVIN RAJARAM MUNDHE
Date: 2024.07.01 19:08:50 +05'30'

**( प्रविण मुंढे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) शिक्षण संचालक (प्राथमिक /माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई
३) शिक्षणाधिकारी (प्राथमिक/ माध्यमिक), जिल्हा परिषद, रायगड, जि.रायगड
४) अध्यक्ष/ सचिव, ज्योती एज्युकेशनल सोसायटी, कळंबोली,रायगड
५) अध्यक्ष/ सचिव, अमर सेवा समिती, ब्रांद्रा, मुंबई
६) निवडनस्ती (एसएम-१).